**सामूहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड,ता.डहाणू, जि.ठाणे यांचे वेतन व वेतनेतर अनुदान वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक : साकृप्र ४०११/प्र.क्र.२०९/का.३ अे

मंत्रालय विस्तार,मुंबई.४०० ०३२

**दिनांक:१२ सप्टेंबर,२०११**

**वाचा :- १. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३,दिनांक ६ मे,२०११**

**२. विभागीय कृषि सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे यांचे पत्र क्र. विकृससंठा/कृषि-२/लेखा/४५२७/२०११, दिनांक १६ ऑगस्ट,२०११**

**शासन निर्णय :-** राज्यातील शेतक-यांना विशेषत: आदिवासी शेतक-यांना नविन शेती तंत्रज्ञानाचा तसेच शेतीशी संलग्न दुग्धव्यवसाय,कुक्कुटपालन इ. विषयासंबंधी प्रशिक्षणाद्धारे माहिती व तंत्रज्ञान अवगत करुन देण्याच्या उद्देशाने ठाणे जिल्हयात सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल हे केंद्र कार्यरत आहे. या संस्थेमार्फत सुरु असलेल्या कार्याचा आणि उपलब्ध सोयी सुविधांचा आदिवासी स्त्री-पुरुष शेतक-यांना चांगला लाभ होत असल्याचा अनुभव आल्यामुळे शासनाने सन १९७५ पासून कोसबाड येथील सामुहिक प्रशिक्षण केंद्र ही योजना १०० टक्के अनुदान तत्वावर गोखले एज्युकेशन संस्थेकडे सुपूर्द केली आहे.

२. गोखले एज्युकेशन संस्थेच्या सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे यांचेकडे शेतकरी प्रशिक्षण योजनेमधील मंजूर असलेल्या अधिकारी व कर्मचां-यांचे जुलै,२०११ ते मार्च,२०१२ करीता (३१) वेतनेतर सहाय्यक अनुदाने व (३६) वेतनासाठी सहाय्यक अनुदाने याप्रित्यर्थ होणा-या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०११-१२ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

मागणी क्रमांक - डी-३
२४०१-पीक संवर्धन
००१-संचालन व प्रशासन
(००)(०१)कृषि आयुक्तालय
३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर
३६-सहाय्यक अनुदान वेतन
(२४०१ ०१३६)

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७६/११/व्यय-१ , दि.३ सप्टेंबर,२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०९१३१४२७४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वीणा राऊत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**आयुक्त,(कृषि) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे**

**संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे**
**विभागीय कृषि सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे**
**जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,ठाणे जिल्हा,ठाणे**
जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण विभाग,जिल्हा ठाणे
**महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर**
**विभागीय आयुक्त,कोकण भवन,नवी मुंबई**
**मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.ठाणे**
**वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय),मंत्रालय,मुंबई.३२**
**कार्यासन अधिकारी,२- अे,१५-अे,१६-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.**
**प्रशिक्षण अधिकारी,सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,**गोखले एज्युकेशन सोसायटी,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे
**निवड नस्ती**